**<u>राज्य मागासवर्ग आयोगाची पुर्नरचना करण्याबाबत</u>**

**महाराष्ट्र शासन**

सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग

शासन निर्णय क्रमांक. सीबीसी.-११/२००८/प्र.क्र.७०८/मावक

मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२ , दिनांक - ३१ डिसेंबर, २०११

वाचा - १. शासन निर्णय, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग क्रमांक सीबीसी.-११/२००८/प्र.क्र.७०८/मावक-५, दिनांक. २४ नोव्हेंबर, २००८

२. शासन शुध्दीपत्रक, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग क्रमांक सीबीसी.-११/२००८/प्र.क्र.७०८/मावक-५, दिनांक. २० फेब्रुवारी, २००९

<u>शासन निर्णय :-</u> मा. सर्वोच्च न्यायालयाने रिटीपटीशन क्रमांक. ९३० /९०- इंद्रा सहानी आणि इतर विरुध्द भारत सरकार यामधील दिनांक. १६/११//१९९२ रोजी दिलेल्या निदेशास अनुसरुन राज्यातील विमुक्त जाती, भटक्या जमाती इतर मागासवर्ग आणि विशेष मागास प्रवर्ग या प्रवर्गात एखाद्या जातीचा समावेश करण्यासाठी किंवा त्या प्रवर्गातुन एखादी जात वगळण्यासाठी आलेल्या मागण्या व तक्रारीची तपासणी करण्यासाठी तसेच मागासवर्गीयांच्या यादीमध्ये (अनुसुचित जाती व अनुसुचित जमाती वगळता) सामाजिक, आर्थिक निकषानुसार प्रगत व उन्नत गट किंवा व्यक्ती निर्धारीत करुन संबंधीत जात वगळण्याकरिता अभ्यासपुर्ण शिफ़ारास राज्य शासनास करण्यासाठी शासन निर्णय दि. १५मार्च, १९९३ अन्वये राज्य शासनाने स्थायी समिती नियुक्त केली होती. दि. १५ मे, १९९५ च्या शासन निर्णयान्वये सदर समितीचे नामकरण राज्य मागासवर्ग आयोग असे करण्यात आले आहे.

२. सदर राज्य मागासवर्ग आयोगाची पुनःर्स्थापना या विभागाच्या शासन निर्णय दि. २४ नोव्हेंबर, २००८ अन्वये करण्यात आली व त्यावर मा. उच्च न्यायालयाचे निवृत्त न्यायमुर्ती व सहा सदस्यांची (प्रत्येक महसुली विभागातून एक) याप्रमाणे नियुक्ती करण्यात आली होती. सदर आयोगाची मुदत दि.२३/११/२०११ रोजी संपुष्टात आलेली आहे. आता राज्य मागासवर्ग आयोग हा पुढील तीन वर्षासाठी या शासन निर्णयाने पुनर्गठीत करण्यात येत असुन, खालीलप्रमाणे आयोगाचे अध्यक्ष व सदस्य यांची तीन वर्षाकरीता नियुक्ती करण्यात येत आहे.

| अ.क्र. | अध्यक्ष/सदस्यांचे नाव | पदनाम |
|---|---|---|
| १ | डॉ. बी.पी. सराफ़, उच्च न्यायालयाचे सेवानिवृत्त मुख्य न्यायमूर्ती | अध्यक्ष |
| २ | श्री. जवाहर चरडे, नागपूर विभाग (सर्वसाधारण) | सदस्य |
| ३ | डॉ. नागोजीराव कुंभार, औरंगाबाद विभाग (इ.मा.व.) | सदस्य |

| | | |
|---|---|---|
| ४ | प्रा. हरि नरके, पुणे विभाग ( इ.मा.व.) | सदस्य |
| ५ | श्री. न. मा. जोशी, अमरावती विभाग (सर्वसाधारण) | सदस्य |
| ६ | श्री. हाजी शौकतभाई तांबोळी, नाशिक विभाग (इ.मा.व.) | सदस्य |
| ७ | श्रीमती. पल्लवी बाळकृष्ण रेणके, मुंबई विभाग (महिला( (भ.ज.) | सदस्य |
| ८ | श्री. कैलास गौड, समाजशास्त्रज्ञ (वि.जा.) | सदस्य |
| ९ | सह संचालक, विजाभज, पुणे | सदस्य सचिव |

३. डॉ बी.पी. सराफ़ हे मा. उच्च न्यायालयाचे निवृत्त मुख्य न्यायमुर्ती असल्याने त्यांचा दर्जा निवृत्त मुख्य न्यायमुर्तींचा राहील. त्याच प्रमाणे इतर सदस्यांचा दर्जा राज्य शासनाच्या सचिव स्तराचा राहील. त्यानुसार अध्यक्ष व सदस्य यांना देय करण्यात आलेला दर्जा हा राजशिष्टाचारा पुरता मर्यादीत राहील तसेच त्यांना मिळणारा प्रवास भत्ता व इतर सोयी सुविधा ह्या आयोगाकरीता वेळोवेळी निर्धारीत केलेल्या शासन निर्णयातील तरतुदीप्रमाणे अनुज्ञेय असतील.

४. सदर शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर दर्शविण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक - 201112311914334500 1 असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

**( शिरीष मोहोड )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रति,
मा. राज्यपाल यांचे सचिव,
मा. मुख्यमंत्री यांचे सचिव,
मा. उपमुख्यमंत्री यांचे सचिव
मा.मंत्री. (सामाजिक न्याय) यांचे खाजगी सचिव.
मा.राज्यमंत्री. (सामाजिक न्याय) यांचे खाजगी सचिव.
मा. विरोधी पक्ष नेते, विधान सभा, विधान भवन, मुंबई.
मा. विरोधी पक्ष नेते, विधान परिषद, विधान भवन, मुंबई.
महालेखापाल, महाराष्ट्र १ / २, मुंबई / नागपूर.
प्रधान सचिव, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
प्रधान सचिव, विधी व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई.
सर्व विभागीय आयुक्त (महसूल)

राज्य मागासवर्ग आयोगाचे अध्यक्ष/ सर्व सदस्य
*सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई.
*प्रबंधक, उच्च न्यायालय, अपिल शाखा, मुंबई / नागपूर / औरंगाबाद.
*प्रबंधक, उच्च न्यायालय, मूळ न्याय शाखा, मुंबई / नागपूर / औरंगाबाद.
सर्व मंत्रालयीन विभाग,

त्यांना विनंती करण्यात येते की, त्यांनी सदर आदेश त्यांचे अधिपत्याखालील सर्व विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुख यांचे निदर्शनास आणून द्यावेत.

आयुक्त, समाजकल्याण आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
संचालक, विमुक्त जाती भटक्या जमाती व इतर मागासवर्ग कल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
सर्व जिल्हाधिकारी तथा जिल्हा दंडाधिकारी
सर्व विभागीय समाजकल्याण अधिकारी /सर्व विशेष जिल्हा समाजकल्याण अधिकारी
जिल्हा कोषाधिकारी, पुणे.
महासंचालक, माहिती व जनसंपर्क, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.

यांना विनंती की, त्यांनी सदर शासन निर्णयास व्यापक प्रसिध्दी द्यावी.

निवड नस्ती, का. मावक (सा.न्या.)